सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत औरंगाबाद, नाशिक, अमरावती या शहरात व नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई ठाणे शिधावाटप क्षेत्र यांच्या कार्यक्षेत्रातील "फ" परिमंडळ कार्यालयांतर्गत शिधापत्रिकाधारंकाना टाटा ट्रस्टच्या सहाय्याने लोह व आयोडीनयुक्त मीठ वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-४४१८/प्र.क्र.२१/नापु-१६-ब**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०५ ऑक्टोबर, २०१८.

वाचा-

१. शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-४४१८/प्र.क्र.२१/नापु-१६-ब, दि.२७.०६.२०१८.

प्रस्तावना-

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सार्वजनिक वितरण व्यवस्थे अंतर्गत पुणे व नागपूर शहरात लोह व आयोडीनयुक्त मीठ प्रायोगिक तत्वावर वितरीत करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर लोह व आयोडिनयुक्त मीठ राज्यातील अन्य शहरात देखील वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव टाटा ट्रस्टद्वारे शासनाकडे सादर करण्यात आला आहे. त्यानुसार सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गत लोह व आयोडीनयुक्त मीठ औरंगाबाद, नाशिक, अमरावती या शहरात व नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई ठाणे शिधावाटप क्षेत्र यांच्या कार्यक्षेत्रातील "फ" परिमंडळ कार्यालय अंतर्गत सर्व शिधापत्रिकाधारंकाना तसेच मागणीप्रमाणे इतर शहरातील शिधापत्रिकाधारकांना टाटा ट्रस्टच्या सहकार्याने रास्तभाव दुकानांमार्फत वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

१. सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत लोह व आयोडीनयुक्त मीठ (डबल फोर्टिफाइड) औरंगाबाद, नाशिक, अमरावती या शहरातील व नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई ठाणे शिधावाटप क्षेत्र यांच्या कार्यक्षेत्रातील "फ" परिमंडळ कार्यालयांतर्गत सर्व शिधापत्रिकाधारंकाना तसेच मागणीप्रमाणे इतर शहरातील शिधापत्रिकाधारकांना मागणीनुसार रास्तभाव दुकानांमार्फत वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. अधिकृत रास्तभाव दुकानदारांमार्फत शिधापत्रिकाधारकांना सदर लोह व आयोडीनयुक्त मीठ ₹१४ प्रतिकिलो या दराने वितरीत करण्यात येईल.

३. सदर लोह व आयोडीनयुक्त मीठाची वाहतूक त्या-त्या जिल्हयाच्या शासकीय गोदामापर्यंत टाटा ट्रस्ट मार्फत करण्यात येईल. सदर मीठ साठविण्यासाठी गोदाम उपलब्ध करुन देणे तसेच सदर मीठ शासकीय गोदामातून रास्तभाव दुकानदारांपर्यंत पोहोचविणे याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी/ नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई ठाणे शिधावाटप क्षेत्र, मुंबई यांची राहील.

४. टाटा ट्रस्ट सदर लोह व आयोडीनयुक्त मीठ शासनास ₹११ प्रतिकिलो दराने उपलब्ध करुन देईल. सदर मीठ रास्त भाव दुकानदारांना ₹१२.५० प्रतिकिलो या दराने उपलब्ध करून देण्यात येईल व

रास्त भाव दुकानदारांनी ₹ १४ प्रतिकिलो या दराने विक्री करावयाची आहे. याव्यतिरीक्त अनुषंगिक खर्चात वाढ झाल्यास सदर खर्चाची जबाबदारी टाटा ट्रस्टची राहील.

५. शासनाने विहित केलेल्या पोषक द्रव्याच्या प्रमाणात शिधापत्रिकाधारकांना उत्तम गुणवत्तापुर्ण डबल फोर्टीफाईड मीठ उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी टाटा ट्रस्टची राहील.

६. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी माहे ऑक्टोबर, २०१८ पासून करण्यात येईल. या शासन निर्णयाच्या अनुषंगाने मीठ वितरणाबाबतची कार्यपध्दती दि.१९.०९.२०१८ रोजीच्या पत्रान्वये निश्चित करण्यात आली असून ती सर्व संबंधितांना स्वतंत्र पत्राद्वारे कळविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००५१७१२१४६७०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food and Civil Supply, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2018.10.05 17:20:16 +05'30'

(स.श्री.सुपे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. मंत्री (अन्ना.पु.ग्रा.स) यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधीपक्ष नेते विधानसभा/परीषद
६. विभागीय आयुक्त, औरंगाबाद, अमरावती व नाशिक.
७. जिल्हाधिकारी, औरंगाबाद, अमरावती व नाशिक.
८. उपायुक्त, औरंगाबाद, अमरावती व नाशिक.
९. जिल्हा पुरवठा अधिकारी, औरंगाबाद, अमरावती व नाशिक.
१०. जिल्हाधिकारी, सर्व.
११. जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी, सर्व.
१२. उपायुक्त पुरवठा, सर्व.
१३. नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई ठाणे शिधावाटप क्षेत्र, मुंबई.
१४. उपनियंत्रक, फ परिमंडळ कार्यालय, ठाणे.
१५. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१६. महालेखापाल (लेखा परीक्षा) १/२, मुंबई/नागपूर.
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, मुंबई/नागपूर.
१८. वित्त विभाग (व्यय-४, अर्थोपाय व अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई.
१९. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.
२०. निवड नस्ती/नापु-१६ ब.